**उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळाच्या कार्यकक्षेतील वसाहत रूग्णलय, गांधीनगर, कोल्हापूर येथील ५ अस्थाई पदांना मुदतवाढ.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.३४/आरोग्य-४

१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: १६ मार्च,२०१५.

**वाचा**

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पीएचसी-१०९७/ प्र.क्र.२६/ ९७/ आरोग्य-४, दि.१६.०१.२००३.**
२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः टीईपी-२००२/ प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६.**
३) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे २०११/ प्र.क्र.८७/ आरोग्य-४, दि.२८.०४.२०११.**
४) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांक: अपदे-२०१४/ प्र.क्र.७५/आरोग्य-४, दि.२९.०३.२०१४.**
५) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर ), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/ वसाहतरूग्णालयकोल्हापूर/ अपदे-५/सन२०१५-१६/८१३-८१४/१५, दि.२९.०१.२०१५.**

**प्रस्तावना**

उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळातील वसाहत रूग्णालय, गांधीनगर, कोल्हापूर येथील २२ अस्थाई पदांपैकी ८० टक्के पदांचे संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये स्थायीकरण करण्यात आले आहे. उर्वरीत ५ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर पदे विभागाच्या आकृतीबंधातील असून सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार येथील एकूण ५ अस्थाई पदांना दिनांक १.०३.२०१५ ते दि. २९.०२.२०१६ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

वसाहत रूग्णालय, गांधीनगर, कोल्हापूर येथील सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या ५ अस्थाई पदांना सदर पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीकरीता रिक्त नव्हती वा या पदांचा अतिरिक्त कार्यभार दिलेला नाही या अटीच्या अधीन राहून ही पदे दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीकरीता चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील. सदर पदांबाबत यापुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करतांना पदांच्या आढाव्याच्या संबंधी पुर्तता करण्यात याव्यात .

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा,११०-रूग्णालये व

दवाखाने,११०-१-मुफसल क्षेत्रातील रूग्णालये व दवाखाने, (०१) (०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रूग्णालये ( २२१० ०१४६) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१२१२३५२४७६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.17 16:46:22 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
९. वैद्यकीय अधिक्षक, वसाहत रूग्णालय, गांधीनगर, कोल्हापूर.
१०. वित्त विभाग (व्यय-१३,अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

## विवरणपत्र

| अ. क्र. | विभागाने तात्पुरत्या जागा प्रथमत: निर्माण केला तो शासन निर्णय | पदनाम | पदांची संख्या | वेतनश्रेणी | ज्या शासकीय आदेशान्वये पदे पुढे चालू ठेवण्यात आली तो शासन निर्णय क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | शा.नि.सा.आ.वि.क्र.एचएचपी-३२८३/५६५/ आरोग्य-३, दि.७.०५.१९८३. | वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ | २ | १५६००-३९१०० (५४००) | शा.नि.,सा.आ.वि.,क्र.अपदे २०१४/प्र.क्र.७५/आ-४, दि.२९.०३.२०१४. |
| २. | | अधिपरिचारिका | २ | ९३००-३४८०० (४२००) | |
| ३. | शा.नि.सा.आ.वि.क्र.पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१,दि.६.०८.२००७ | औषध निर्माता/ मिश्रक | १ | ५२००-२०२०० (२८००) | |
| | **एकूण** | | ५ | | |